( १२ ) मुन्शी प्रेमचंद यांच्या वैचारिक वैभवाची ओळख तुमच्या शब्दांत थोडक्यांत करून द्या.

( १३ ) मुन्शी प्रेमचंद यांच्या विविध प्रकारच्या साहित्याचा आढावा अगदीं संक्षेपानें द्या.

( १४ ) धनवान् व कारखानदार यांच्याविषयीं प्रेमचंदांचीं मतें कोणत्या प्रकारचीं होतीं ? त्यांच्याशीं प्रेमचंदांचें कितपत पटत असे ?

( १५ ) मुन्शी प्रेमचंद यांच्या जीवनाचें सार वीस-पंचवीस ओळींत लिहून दाखवा.

( १६ ) तुम्हीं वाचलेल्या चरित्रांत अनेक प्रकरणें आहेत. त्यांपैकीं प्रत्येकास तुम्ही स्वतंत्र असें अन्वर्थक शीर्षक द्या.

( १७ ) मुन्शी प्रेमचंद हे स्वतः आपली जीवन-कथा सांगत आहेत, अशी कल्पना करून तीस ओळींत त्यांची जीवन-कथा लिहा.

( १८ ) प्रेमचंदांच्या चरित्रांतील तुमच्या लक्षांत राहतील असे तीन प्रसंग सांगा व त्यांचें महत्त्व कोणतें तें लिहा.

( १९ ) शिवरानीदेवींच्या स्वभावांतील मुख्य मुख्य वैशिष्ट्यें थोडक्यांत लिहा.

( २० ) मराठी भाषेंतील प्रेमचंदांचीं पुढील अनुवादित पुस्तकें वाचा—

१. प्रेमचंदांच्या गोष्टी — आ. ल. जोशी
२. कथा-मंजरी — ह. बा. अत्रे
३. 'प्रेमचतुर्थी' — यदुनाथ थत्ते

• • •